शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) मधील संगणकाचे सुटे भाग (की-बोर्ड, माउस, टोनर-कार्ट्रिज, पेन ड्राईव्ह इ. पुरवठा करण्यासाठी मे. आरके एंटरप्रायजेस, मुंबई या पुरवठादाराची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.०३/नोंदणी शाखा,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक: २० मार्च, २०२५**

**शासन आदेश :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) मधील संगणकांसाठी सुटे भाग (की-बोर्ड, माउस, टोनर-कार्ट्रिज, पेन ड्राईव्ह इ.) पुरवठा करण्यासाठी पुरवठादारासोबत एक वर्षाचा दरकरार करण्याकरीता दिनांक १६ जानेवारी, २०२५ रोजीच्या सूचनेद्वारे शासनाच्या संकेतस्थळावरून निविदा मागविण्यात आल्या होत्या. प्राप्त झालेल्या निविदांपैकी मे. आरके एंटरप्रायजेस, मुंबई या संस्थेने सादर केलेली निविदा तांत्रिकदृष्ट्या योग्य असून, इतर निविदाधारकांपेक्षा कमी किंमतीची आहे. त्यामुळे दिनांक ०६ मार्च, २०२५ ते दिनांक ०५ मार्च, २०२६ पर्यंतच्या एका वर्षाच्या कालावधीकरिता मे. आरके एंटरप्रायजेस, मुंबई यांची निविदा मंजूर करुन, त्यांच्यासोबत खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून सेवाकरार करण्यासाठी किंमतीच्या आधारे निवड करण्यात आली आहे. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (खुद्द) साठी संगणकांचे उच्च प्रतीचे सुटे भाग (की-बोर्ड, माउस, टोनर-कार्ट्रिज, पेन ड्राईव्ह इ.) पुरविण्याचा कालावधी दिनांक ०६.०३.२०२५ ते दिनांक ०५.०३.२०२६ इतका राहील.

I. विभागामार्फत वेळोवेळी नोंदविलेल्या मागणीनुसार व निविदेमध्ये नमूद केलेल्या कंपनीचे अथवा त्यापेक्षा चांगल्या दर्जाचे संगणकांचे सुटे भाग (की-बोर्ड, माउस, टोनर-कार्ट्रिज, पेन ड्राईव्ह इ.) पुरवठा दरपत्रकात नमूद केलेल्या दराने तातडीने पुरवणे बंधनकारक असेल.

II. विभागाने आवश्यकतेनुसार संगणकांचे सुटे भाग (की-बोर्ड, माउस, टोनर-कार्ट्रिज, पेन ड्राईव्ह इ.) मागणी केल्यावर मागणी केलेले साहित्य निश्चित केलेल्या दराने व दर्जानुसार पुरवठा करणे पुरवठादारास बंधनकारक राहील. पुरविण्यात आलेल्या साहित्याच्या दर्जात अथवा किंमतीत कोणताही बदल केल्यास, सदर वस्तू नाकारणे तसेच करारनाम्याचे पालन समाधानकारक न झाल्यास करारनामा संपुष्टात आणणे, याबाबत विभाग जो निर्णय घेईल तो पुरवठादारास मान्य राहील.

III. यादीमध्ये नमूद केलेल्या वस्तूंव्यतिरिक्त इतर वस्तूंची विभागास तातडीने आवश्यकता असल्यास, सदर वस्तूंची मागणी नोंदविल्यानंतर, ती तातडीने पुरवणे बंधनकारक असेल. तसेच अशा वस्तु बाजारभावाच्या किंमतीपेक्षा (एम.आर.पी.) ५ टक्के कमी दराने पुरवठा करणे पुरवठादारास बंधनकारक राहील.

IV. पुरवठादारांने नमूद केलेल्या वस्तूंचे दर हे जीएसटी व्यतिरिक्त असल्यामुळे संबंधित वस्तूंना अनुज्ञेय असलेला जीएसटी दर अतिरिक्त अदा करण्यात येईल.

V. प्रशासकीय कारणास्तव देयक अदा करण्यास विलंब झाल्यास, विलंब आकार किंवा व्याज देय राहणार नाही.

२. उपरोक्त अटींच्या अनुषंगाने मे. आरके एंटरप्रायजेस, मुंबई या संस्थेकडून करारनामा ५०० रुपयांच्या मुद्रांक कागदावर (Stamp paper) सेवासंविदा करार साक्षांकित करुन घेण्यात आला आहे.

३. सदर शासन आदेश, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग दोन, अनुक्रमांक १ नियम २ व ७ अन्वये मंजूरी देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास असून, सदर अधिकारांचा वापर करून तसेच उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक ३०.१०.२०१५ व दिनांक ७.०५.२०२१ मधील विहित अटी व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यास आला असून त्याचा संकेताक २०२५०३२०११४८१७६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE DATTATRAY C

Digitally signed by SHINDE DATTATRAY C
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=c1a6eca3de0649dd85e78e2f9d0680fd23c23c7952a7d5dc91d34437d85a2ae4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D64E9D959B0D379CE4141FED53CDE1EF8DF885C3CE6552805FBBAE4AF52C9EA8, cn=SHINDE DATTATRAY C
Date: 2025.03.20 11:49:29 +05'30'

**( द. छ. शिंदे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल- १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई- ४०० ०२०
४. महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
७. लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मे. आरके एंटरप्रायजेस, फोर्ट, मुंबई.
९. निवडनस्ती/ नोंदणी शाखा